कृषि यांत्रिकीकरण उप अभियानाचा सन २०१९-२० चा अनुसूचित जमाती प्रवर्गाचा अखर्चित निधी पुनरुज्जीवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देणे व रु.१६६७ लक्ष निधीचे वितरण करणे.

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-०५२०/प्र.क्र.५४ (भाग-३)/१४-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ११ जून, २०२०

**संदर्भ:-**

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल, २०२०

२) केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.३-१ (Revalidation/२०१५)-M&T (I & P), दि. २२ एप्रिल, २०२०

३) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.जा.क्र/कृ.यां.उ.अ/२०२०-२१/गुनि-५/१२६८०/२०२०, दि.११ मे, २०२०.

४) आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.१ जून, २०२०.

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेंतर्गत- कृषी यांत्रिकीकरण उप- अभियान राज्यात राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०: ४० असे आहे. सन २०१९-२० या वर्षासाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी रु.७५०० लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन दिला होता. सदर निधीपैकी रु.२९०७.९५४ लक्ष निधी आर्थिक वर्षअखेर अखर्चित राहिला. सदर निधी चालू आर्थिक वर्षात खर्च करण्यासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन २२ एप्रिल, २०२० च्या पत्रान्वये पुनर्जिवित करुन दिलेला आहे. या अखर्चित निधीमध्ये सर्वसाधारण, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अनुक्रमे रुपये रु.४०७.९५४ लक्ष, रु.१५०० लक्ष व रु.१००० लक्ष निधीचा समावेश आहे.

अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी शासन कोषागारात जमा आहे. अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु.१००० लक्ष व त्यास समरुप राज्य हिश्श्याचा निधी रु.६६७ लक्ष अशा एकूण रु.१६६७ लक्ष रकमेचा कार्यक्रम पुनर्जिवित करुन चालू आर्थिक वर्षात राबविण्यास मान्यता देऊन सदर निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

१. कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाचा अनुसूचित जमाती प्रवर्गाचा सन २०१९-२० या वर्षातील केंद्र हिश्श्याचा अखर्चित निधी रु.१००० लक्ष (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.६६७ लक्ष (अक्षरी रुपये सहा कोटी सदुसष्ट लक्ष फक्त) असा एकूण रु.१६६७ लक्ष (अक्षरी रुपये सोळा कोटी सदुसष्ट लाख फक्त) निधीचा कार्यक्रम पुनर्जिवित करुन चालु आर्थिक वर्षात राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पुनर्जिवित कार्यक्रमाच्या अंमबजावणीसाठी केंद्र हिश्श्याच्या रु.१००० लक्ष (अक्षरी रुपये दहा फक्त) व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.६६७ लक्ष (अक्षरी रुपये सहा कोटी सदुसष्ट लाख फक्त) असा एकूण रु.१६६७ लक्ष (अक्षरी रुपये सोळा कोटी सदुसष्ट लक्ष फक्त) निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी खालील लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ च्या मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र | राज्य |
|---|---|
| मागणी क्रमांक-टी-५<br>२४०१-पीक संवर्धन,<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना,<br>(०१)(११) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो) (केंद्र हिस्सा) (२४०१A४५९ ),<br>३३ अर्थसहाय्य | मागणी क्रमांक-टी-५<br>२४०१-पीक संवर्धन,<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना,<br>(०१)(१०) कृषी उन्नती योजना- कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (कें.पु.यो) (राज्य हिस्सा)<br>(२४०१A४४१), ३३ अर्थसहाय्य |

४. निधीचे सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, निधी आहरण व संवितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

५. उपलब्ध निधी फक्त अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठीच खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. अनुदानाची रक्कम PFMS प्रणालीद्वारे लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करावी.

७. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या कृषी यांत्रिकीकरण उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपद्धती अनुसरुन, सर्व वित्तीय कायदे/ नियमांचे/ प्रकियांचे व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठल्याही शासन निर्णयाचा वा परिपत्राचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

९. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

१०.सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन दि.१ जून, २०२० च्या शासन निर्णयान्वये व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७७/२०२०/व्यय-१ दि. १४ मे, २०२० अनव्ये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

११.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१११११५५३२७९०१असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant
Chandrakant
Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b896502 5d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f2 0d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.06.11 12:59:00 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय,पुणे
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
४. आदिवासी आयुक्त, नाशिक.
५. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व संचालक /सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
७. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ दिनकरराव देसाई मार्ग, गोरेगाव (पूर्व) मुंबई- ६५.
८. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
९. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१०.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर/(लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
११. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखा परिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई- ४०००२०.
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. अध्यक्ष,सर्व जिल्हा परिषदा
१४. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
१६. वित्त विभाग ( व्यय-१ वअर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
१७. ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८. निवड नस्ती (कार्यासन -१४अे)